राज्य शासकीय अधिकारी / कर्मचारी यांना
केंद्र शासनाच्या धर्तीवर जुनी निवृत्तीवेतन
योजना लागू करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग,**
**शासन आदेश क्रमांक : निवेयो-४२२४/प्र.क्र.६५/सेवा-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
चौथा मजला, मुख्य इमारत, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- ११ जुलै, २०२४.

**वाचा :-**

१. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.संकिर्ण-२०२३/प्र.क्र.४६/सेवा-४, दि.०२.०२.२०२४.
२. केंद्र शासनाच्या निवृत्तीवेतन व निवृत्तीवेतन धारकांचे कल्याण विभागाचे पत्र क्र.५७/०५/२०२१-पी व पीडब्ल्यू (बी), दि.०३.०३.२०२३.
३. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, कोकण, मुंबई यांचे पत्र, दि.२२.०४.२०२४ व दि.२८.०३.२०२४.
४. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई यांचे पत्र, दि.२१.०३.२०२४.
५. श्रीमती अनिता भा. परदेशी, शहर अभियंता, कल्याण डोंबिवली महानगरपालिका, कल्याण यांचे पत्र, दि.२३.०४.२०२४.
६. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांचे पत्र, दि.१६.०५.२०२४.
७. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, अमरावती यांचे पत्र, दि.०६.०५.२०२४. (२ पत्र)
८. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांचे पत्र, दि.२८.०५.२०२४.

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाच्या अधिकारी / कर्मचारी यांची नियुक्ती (Appointed) ज्या पदावर किंवा रिक्त जागेवर करण्यात आली आहे व ज्याची जाहिरात / भरतीची / नियुक्तीची अधिसूचना नवीन निवृत्तीवेतन योजना लागू करण्याच्या अधिसूचनेच्या दिनांकापूर्वी म्हणजेच दि.२२.१२.२००३ पूर्वी निर्गमित झाली आहे व जे दि.०१.०१.२००४ रोजी किंवा त्यानंतर शासन सेवेत दाखल झाले आहेत व ज्यांना नवीन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना लागू झाली, त्या केंद्र शासनाच्या अधिकारी / कर्मचारी यांना केंद्रीय नागरी सेवा (निवृत्ती) नियम, १९७२ / २०२१ लागू करण्याचा एक वेळ पर्याय (One Time Option) देणेबाबत केंद्र शासनाच्या निवृत्तीवेतन व निवृत्तीवेतनधारकांचे कल्याण विभागाच्या संदर्भाधीन क्र.२ येथील कार्यालयीन ज्ञापनान्वये निर्णय घेण्यात आला आहे.

**२.** केंद्र शासनाच्या उपरोक्त निर्णयाच्या धर्तीवर, राज्य शासनाच्या सेवेत जे अधिकारी / कर्मचारी दि.०१.११.२००५ रोजी किंवा त्यानंतर शासन सेवेत नियुक्त करण्यात आले आहेत. तथापि, त्यांची पदभरतीची जाहिरात / अधिसूचना, दि.०१.११.२००५ पूर्वी निर्गमित झालेली आहे. अशा राज्य शासकीय अधिकारी / कर्मचारी यांना महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम, १९८२, महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतनाचे अंशराशीकरण) नियम, १९८४ व महाराष्ट्र सर्वसाधारण भविष्यनिर्वाह निधी नियम, १९९८ व

अनुषंगिक नियमाच्या तरतूदी लागू करण्यासाठी एक वेळ पर्याय (One Time Option) संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयान्वये देण्यात आलेला आहे.

३. वित्त विभागाच्या उपरोक्त शासन निर्णयातील तरतुदीनुसार, केंद्र शासनाच्या धर्तीवर, जुनी निवृत्तीवेतन योजना लागू करण्याबाबत विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील कार्यालयांकडून तत्कालीन सहायक कार्यकारी अभियंता, गट-अ संवर्गात दि.०१.११.२००५ पूर्वीच्या जाहिरातीनुसार शासन सेवेत प्रथम नियुक्ती करण्यात आलेल्या व सध्या अधीक्षक अभियंता (स्थापत्य) संवर्गात कार्यरत असलेल्या अधिकाऱ्यांचे अर्ज / विकल्प शासन मंजूरीस्तव सादर करण्यात आले आहेत.

४. सबब, सार्वजनिक बांधकाम विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील अधीक्षक अभियंता (स्थापत्य) संवर्गातील अधिकाऱ्यांना केंद्र शासनाच्या धर्तीवर, महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम, १९८२, महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतनाचे अंशराशीकरण) नियम, १९८४ व महाराष्ट्र सर्वसाधारण भविष्यनिर्वाह निधी नियम, १९९८ व अनुषंगिक नियमाच्या तरतूदी लागू करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत पुढीलप्रमाणे आदेश देण्यात येत आहेत :-

**शासन आदेश :-**

सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गत अधीक्षक अभियंता (स्थापत्य) संवर्गात सध्या कार्यरत असलेल्या व खालील विवरणपत्रात दर्शविण्यात आलेल्या अधिकाऱ्यांची राज्य शासनाच्या सेवेतील प्रथम नियुक्ती ही, महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा परीक्षा-२००४ (जाहिरात क्र.३७४(१)/२००४/तीन, दि.१५ सप्टेंबर, २००४) नुसार म्हणजेच, दि.०१.११.२००५ पूर्वी पदभरतीची जाहिरात / अधिसूचना निर्गमित केल्यानुसार झालेली आहे.

| अ. क्र. | अधीक्षक अभियंत्याचे नांव | मूळ संवर्ग | कार्यालय | अर्ज / विकल्प प्राप्त दिनांक |
|---|---|---|---|---|
| १ | श्री. प्रशांत प्रेमसुख सोनग्रा | AEE | अधीक्षक अभियंता तथा नगर अभियंता, ठाणे महानगरपालिका, ठाणे. | २४.०३.२०२४ |
| २ | श्री. प्रमोद पांडुरंग बनगोसावी | AEE | अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र राज्य पायाभूत सुविधा विकास महामंडळ मर्या., मुंबई. | २५.०४.२०२४ |
| ३ | श्रीमती अनिता भागचंद परदेशी | AEE | शहर अभियंता, कल्याण डोंबिवली महानगरपालिका, कल्याण. (प्रतिनियुक्ती) | २६.०४.२०२४ |
| ४ | श्री. संजयकुमार सावंतराव माळी | AEE | अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, सोलापूर. | २८.०५.२०२४ |
| ५ | श्रीमती विभावरी प्रकाश वैद्य | AEE | अधीक्षक अभियंता (प्रमंग्रासयो) महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, अमरावती विभाग, अमरावती. | २८.०५.२०२४ |
| ६ | श्री. विशाल शांताराम जवंजाळ | AEE | अधीक्षक अभियंता, दक्षता व गुणनियंत्रण मंडळ. अमरावती. | २८.०५.२०२४ |
| ७ | श्रीमती वर्षा धनाजी अहिरे | AEE | अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ मर्यादित, मुंबई, शिबीर कार्यालय, नाशिक. | २९.०५.२०२४ |
| ८ | श्रीमती सुषमा निशांत गायकवाड | AEE | अधीक्षक अभियंता, रायगड सार्वजनिक बांधकाम मंडळ, नवी मुंबई. | ०४.०६.२०२४ |

२. वरील अधिकाऱ्यांची नियुक्ती महाराष्ट्र लोकसेवा आयोग, अधिसूचना क्रमांक ३७४ (१)/२००४/तीन, दि.१५ सप्टेंबर, २००४ अन्वये, महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा परीक्षा-२००४ मध्ये, सरळसेवा भरतीसाठी घेण्यात आलेल्या एकत्रित स्पर्धा परिक्षेच्या जाहिरातीद्वारे करण्यात आली आहे. सदर परीक्षा शनिवार, दि.०५ फेब्रुवारी, २००५ व रविवार, दि.०६ फेब्रुवारी, २००५ रोजी घेण्यात आली होती. महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा गट-अ मध्ये सन २००४ च्या मागणीपत्रानुसार, सन २००४ मध्ये सरळसेवा भरतीसाठी घेण्यात आलेल्या एकत्रित स्पर्धा परीक्षेच्या निकालाच्या आधारे, महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने केलेल्या शिफारशीनुसार, उपरोक्त अधिकाऱ्यांना सार्वजनिक बांधकाम विभागात महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा गट-अ मध्ये, सहायक कार्यकारी अभियंता, गट-अ या पदावर सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन आदेश क्र.जीएबी-२००७/प्र.क्र.१९४/सेवा-२, दि.१४.०९.२००७ अन्वये नियुक्ती देण्यात आली आहे.

३. उक्त अधिकाऱ्यांनी जुनीनिवृत्ती वेतन योजना व अनुषंगिक नियम लागू करण्याचा पर्याय विहित मुदतीत सादर केलेला आहे.

४. सबब, **वित्त विभागाच्या दि.०२.०२.२०२४ रोजीच्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार, वरील विवरणपत्रात नमूद केलेल्या एकूण ०८ अधिकाऱ्यांना, केंद्र शासनाच्या धर्तीवर महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम, १९८२, महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतनाचे अंशराशीकरण) नियम, १९८४ व महाराष्ट्र सर्वसाधारण भविष्यनिर्वाह निधी नियम, १९९८ व अनुषंगिक नियमाच्या तरतूदी लागू करण्यात येत आहेत.**

५. उक्त अधिकाऱ्यांना वित्त विभाग, शासन निर्णय, दि.०२.०२.२०२४ नुसार, जुनी निवृत्तीवेतन योजना व अनुषंगिक नियम लागू करण्यात येत असल्यामुळे त्यांचे राष्ट्रीय निवृत्तिवेतन प्रणाली (NPS) मधील खाते संबंधित अधिकाऱ्यांच्या कार्यालय प्रमुखांनी तात्काळ बंद करावे. तसेच वरील अधिकाऱ्यांचे भविष्यनिर्वाह निधीचे (GPF) खाते उघडण्यात यावे व सदर खात्यात राष्ट्रीय निवृत्तिवेतन (NPS) खात्यातील त्यांच्या हिश्याची रक्कम देय / अनुज्ञेय व्याजासह जमा करण्यात यावी. तसेच, त्यांच्या राष्ट्रीय निवृत्तिवेतन (NPS) खात्यातील राज्य शासनाच्या हिश्याची रक्कम देय / अनुज्ञेय व्याजासह राज्याच्या एकत्रित निधीत वळती करण्यात यावी.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०२४०७१११४५०४४२८१८** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANAGHA ABHAY JAWALE

Digitally signed by ANAGHA ABHAY JAWALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT,
2.5.4.20=1b2d80236ea086889a45c2dcd2bcbeeb1963360ef86a463c0a11f7be167e68eb, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F265FDD947D3EB873F7094E1B871AF8C32B21F87C2B270064CF1A727E47C456D, cn=ANAGHA ABHAY JAWALE
Date: 2024.07.11 15:01:48 +05'30'

**( अनघा जावळे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. सर्व संबंधित मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग.
२. सर्व संबंधित अधिकाऱ्यांचे आहरण व संवितरण अधिकारी व नियंत्रक अधिकारी (लेखा विभाग).
३. सर्व संबंधित अधिकारी यांना संबंधित मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग यांचेमार्फत.
४. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई.

५. महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
६. अधिदान व लेखाधिकारी, अधिदान व लेखाधिकारी कार्यालय, मुंबई.
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
८. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालय,................
९. अपर मुख्य सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक.
१०. सचिव (रस्ते / बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक.
११. सर्व सह सचिव / उप सचिव / अवर सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. उप सचिव, सेवा-४, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. कार्यासन अधिकारी (आस्था-२ / रोखशाखा ), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. निवडनस्ती / कार्यासन, सेवा-१.